**राज्यपुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयायो-०८१८/ प्र.क्र.२३१/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: १२ सप्टेंबर, २०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यात शेती हा प्रमुख व्यवसाय आहे. तथापि, शेती कामासाठी मजूरांचा प्रश्न गंभीर आहे. सध्याचे मजुरीचे दर व त्यामुळे शेतीसाठी येणारा खर्च, मजूरांच्या अभावामुळे शेतीची कामे वेळेवर न होणे आणि प्रत्यक्ष शेतीतून मिळणारे उत्पन्न यामुळे शेती व्यवसाय हा खडतर होत आहे.

सन २०२२ पर्यंत शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याचे केंद्र शासनाचे उद्दिष्ट असून शेतीकरीता लागणाऱ्या निविष्ठाचा खर्च कमी करुन उत्पादनामध्ये वाढ करावयाची झाल्यास पारंपारीक शेतीमध्ये बदल करुन आधुनिक पद्धतीने यांत्रिकीकरणाद्वारे शेती करणे आवश्यक आहे. त्यासाठी पेरणी, कापणी पश्चात प्रकिया यांत्रिकीकरणाद्वारे करणे गरजेचे आहे. यांत्रिकीकरणाचा मोठया प्रमाणावर वापर केल्यास शेती उत्पादनामध्ये वाढ होऊन शेतकऱ्यांच्या उत्पन्नात वाढ होणे शक्य आहे.

महाराष्ट्रात सुमारे ८०% शेतकरी हे अल्प व अत्यल्प भूधारक आहेत. यांत्रिकीकरणासाठी लागणारे यंत्र / अवजारे शेतकरी त्यांच्या आर्थिक परिस्थितीमुळे खरेदी करु शकत नाहीत. त्यासाठी शेतकऱ्यांना आर्थिक सहाय्य करणे गरजेचे आहे. केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत कृषी यांत्रिकीकरणाचा कार्यक्रम राज्यात राबविण्यात येतो. त्याचप्रमाणे, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान, राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान व एकात्मिक फलोत्पादन विकास कार्यक्रम या अंतर्गत सुद्धा अल्प प्रमाणात यांत्रिकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यात येतो. तथापि, शेतकऱ्यांकडून असणाऱ्या मागणीच्या प्रमाणात या योजनांमधून शेतकऱ्यांना कृषी औजारांचा पुरवठा करणे शक्य होत नाही. यापुर्वी राष्ट्रीय कृषी विकास योजनेमधून कृषी यांत्रिकीकरणासाठी मोठया प्रमाणावर निधी उपलब्ध करुन देण्यात येत होता. तथापि, सद्यस्थितीत राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून देण्यात येणाऱ्या निधीमध्ये मोठया प्रमाणावर घट झाली आहे. त्यामुळे, कृषी यांत्रिकीकरणासाठी राष्ट्रीय कृषी विकास योजनेमधून फारसा निधी उपलब्ध करुन देणे शक्य होत नाही. तसेच, राष्ट्रीय कृषी विकास योजनेमध्ये ट्रॅक्टर, ऊस कापणी यंत्र, पॉवर टिलर यासारख्या जास्त किंमतीच्या यंत्राना अनुदान अनुज्ञेय नाही. परंतु, सदर यंत्राची मागणी मोठया प्रमाणात असल्यामुळे केंद्र शासन पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना प्रभावीपणे राबविण्यास मर्यादा आहेत.

सबब या पार्श्वभुमीवर शेतकऱ्यांकडून कृषी औजाराची करण्यात येत असलेली मागणी विचारात घेऊन राज्य शासनाची स्वतंत्र कृषी यांत्रिकीकरण योजना राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्याबाबत शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-१९ या वर्षापासून राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनानुसार करण्यात यावी .

३. या योजनेंतर्गत, केंद्र शासनाच्या कृषी यांत्रिकीकरण उप अभियानामधील घटक क्र.३ - वैयक्तिक लाभार्थी शेतकऱ्यांना कृषि अवजारे/यंत्रे खरेदीसाठी अनुदान देणे व घटक क्र. ४- कृषि अवजारे / यंत्रे बँकांना अनुदान दणे या घटकाची अंमलबजावणी करण्यात यावी.

४. सदर योजनेंतर्गत, केंद्र शासनाच्या कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मागदर्शक सूचनानुसार अनुज्ञेय असलेल्या यंत्र व औजारांनासाठी केंद्र शासनाने निश्चित केलेल्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे. सदर अनुदान लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर DBT पध्दतीने अदा करण्यात यावे.

५. ज्या लाभार्थीनी केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियान किंवा इतर योजनांतर्गत औजारे/ यंत्रे यांच्या मागणीसाठी अर्ज केला आहे, तथापि, निधी अभावी सदर योजनांमधून त्यांना औजारे/यंत्रे मंजूर करणे शक्य झाले नाही, अशा शेतकऱ्यांना या योजनेमधून उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत पूर्व संमती देऊन योजनेचा लाभ देण्यात यावा.

६. पूर्वसंमती दिलेल्या पात्र लाभार्थ्यांने केंद्र व राज्य शासनाच्या अधिकृत सक्षम संस्थानी ज्या यंत्र/औजारांचे रितसर परिक्षण (Testing) करुन ते BIS अथवा अन्य सक्षम संस्थांनी निश्चित केलेल्या प्रमाणकानुसार (Standards) असल्याचे प्रमाणित केले असेल त्याच यंत्र/ औजारांची पूर्वसंमती प्राप्त लाभार्थी शेतकऱ्यांनी खरेदी करावयाची आहे.

७. निवड झालेल्या पात्र लाभार्थीनी खरेदी केलेल्या यंत्र/औजाराच्या देयकाची रक्कम विक्रेत्यास अदा करणे ते लाभार्थ्यांस अनुदान अदा करण्यापर्यंतच्या कार्यवाहीसाठी दि.२७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सन २०१८-१९ च्या उन्नत शेती - समृध्द शेतकरी मोहिम राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनामधील परिच्छेद क्र.४.५, कृषी यांत्रिकीकरण मधील ४.५.१० ते ४.५.१४ येथील विहीत कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

८. कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान किंवा या योजनेंतर्गत एखादया लाभार्थ्यास ज्या यंत्र/औजार यासाठी लाभ देण्यात आला असेल अशा लाभार्थ्यांस पुन्हा त्याच यंत्र/औजारासाठी ५ वर्षाच्या कालावधीत पुन:श्च लाभ देण्यात येऊ नये.

९. पूर्व संमती नसताना जर शेतकऱ्याने यंत्र/औजारांची खरेदी करुन अनुदानासाठी प्रस्ताव सादर केला असेल, तर असा शेतकरी अनुदानासाठी पात्र असणार नाही.

१०. कृषी यांत्रिकीकरणा अंतर्गत लाभार्थी निवडीसाठी शेतकऱ्यांकडून अर्ज स्विकारणासाठी कृषी आयुक्तालयाकडून तात्काळ ऑनलाईन प्रणाली विकसित करण्यात यावी.

११. या योजनेंतर्गत अल्प व अत्यल्प भु-धारक शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

१२. कृषी औजारे बँके अंतर्गत अनुदानाचा लाभ देण्यासाठी शेतकरी उत्पादक कंपन्या, शेतकरी गट यांना प्राधान्य देण्यात देण्यात यावे.

१३. ज्या वैयक्तिक लाभधारकांनी अथवा शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपनी इ. संस्थांनी बँकाकडून कर्ज घेवून, कृषी औजारे बँक स्थापण्यासाठी यंत्र व औजारांची खरेदी केली असेल अशा वैयक्तिक लाभार्थी/ संस्थाच्या अनुदानाची रक्कम त्यांच्या कर्ज खात्यावर जमा करण्यात यावी.

१४. एखाद्या औजाराची/यंत्राची मागणी मोठया प्रमाणात आहे, तथापि, अशा औजार/यंत्राचा समावेश कृषि यांत्रिकीकरण उप अभियानामध्ये नाही, अशा औजार/यंत्राचा समावेश राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजनेमध्ये, राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या व मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय मान्यता समितीच्या मान्यतेने करण्यात येईल.

१५. सदर योजनेंच्या अमलबजावणीसाठी प्रत्येक वर्षी किमान रु.५० कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

१६. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक निधीची तरतूद करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यात येईल.

१७. सदर योजनेची अंमलबजावणी आयुक्त, कृषी हे करतील व या योजनेच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना तात्काळ निर्गमित करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१२१६३४३४११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.09.12 16:37:38 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई, ३२.
२. मा. मंत्री (कृषी), मंत्रालय, मुंबई, ३२.
३. मा. राज्यमंत्री (कृषी), मंत्रालय, मुंबई, ३२.
४. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (कृषी), मंत्रालय, मुंबई, ३२.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक (नि. व गु.नि.), कृषि आयुक्तालय,पुणे
८. सर्व संचालक / सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर लेखा परिक्षा /(लेखा व अनुज्ञेयता)
१२. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१३. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१५. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)